राष्ट्रपिता महात्मा गांधी यांची १५० व्या जयंती साजरी करण्याकरीता राबविण्यात येणाऱ्या विविध कार्यक्रमांना निधी उपलब्ध करून देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

### शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१९ /प्र.क्र.४६ /पंरा-१

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख:- २७ मार्च,२०२०

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८ / प्र.क्र.८५ /पंरा-१ दिनांक १६ एप्रिल, २०१८.
२) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८ / प्र.क्र.८४ /पंरा-१ दिनांक २४ सप्टेंबर, २०१८.
३) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८ / प्र.क्र.१६८ /पंरा-१ दिनांक १७ जुलै, २०१९.
४) मा. मंत्री ( वित्त आणि नियोजन व वने ) तथा अध्यक्ष राज्यस्तरीय समिती यांच्या अध्यक्षेतेखाली दि.२०/८/२०१९ रोजी झालेली बैठक
५) शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१९ / प्र.क्र.४६ /पंरा-१ दिनांक २६ फेब्रुवारी, २०२०.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रपिता महात्मा गांधीजीं यानी दिलेली शिकवण, आचरणात आणलेली मुल्ये, संदेश जगभरातील पुढील पिढ्यांपर्यंत जिवंत ठेवण्याकरीता महात्मा गांधीजी यांच्या १५० व्या जयंती निमित्त दि. २ ऑक्टोंबर,२०१८ ते दि. २ ऑक्टोंबर,२०२० या दोन वर्षाच्या कालावधीत राज्य शासनामार्फत विविध कार्यक्रमांचे आयोजन केले जाणार आहे. याकरीता संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णय दि.१६ एप्रिल,२०१८ अन्वये मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय समिती तसेच संदर्भाधीन क्र.२ येथील दि. २४ सप्टेंबर,२०१८ अन्वये तत्कालीन मा. मंत्री ( वित्त व नियोजन आणि वने ) यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय समिती गठीत करण्यात आली होती. या दोन्ही समित्यांनी विविध विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रमांचा वेळोवेळी आढावा घेतला आहे.

यासंदर्भात दि. ५ डिसेंबर,२०१८ रोजी राज्यस्तरीय समितीची प्रथम बैठक तत्कालीन मा. मंत्री ( वित्त आणि नियोजन व वने ) यांच्या अध्यक्षतेखाली समिती सभागृह क्र.३ ,मंत्रालय,मुंबई येथे आयोजित करण्यात आली होती. या बैठकीमध्ये **मा. मंत्री महोदयांनी सदरचे कार्यक्रम राबवितांना राज्य शासनामार्फत विविध प्रशासकीय विभागाकडून राबविण्यांत येणाऱ्या कार्यक्रमांसाठी प्रत्येक विभागाने स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्याऐवजी ग्रामविकास विभागाने १ स्वंतत्र लेखाशिर्ष उघडावे व त्यामध्ये निधी अर्थसंकल्पीत करून तो संबंधित विभागाकडे सुपूर्द करावा, असे निर्देश दिले होते.**

तत्कालीन मा. मंत्री ( वित्त व नियोजन आणि वने ) यांनी दिलेल्या निर्देशनुसार नविन लेखाशिर्ष उघडण्याबाबतचा प्रस्ताव महालेखापाल महाराष्ट्र -१,मुंबई येथे पाठविण्यात आला होता. महालेखापाल कार्यालय, नियोजन विभाग व वित्त विभाग यांनी दिलेल्या सहमतीनुसार या विभागाकडे खालीलप्रमाणे लेखाशिर्ष उघडण्यात आलेले आहे.

मागणी क्र . एल -३,
२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण
६०, सामाजिक सुरक्षा व सामाजिक कल्याण कार्यक्रम
८००, इतर कार्यक्रम,
( ०० ) ( ०१ ) राष्ट्रपिता महात्मा गांधीजी यांचा १५० व्या जयंती स्मरणोत्सव साजरा करणे-राष्ट्रपित्याला आदरांजली म्हणून अभियानांतर्गत विविध उपक्रमांचे आयोजन करणे ( कार्यक्रम )

सदर लेखाशिर्षामध्ये जून २०१९ च्या पावसाळी अधिवेशात खालीलप्रमाणे १५० कोटीचे अनुदान पुरक मागणीव्दारे अर्थसंकल्पीत करण्यात आले आहे.

२०-इतर प्रशासकीय खर्च-३० कोटी
२६- जाहिराती व प्रसिध्दी- २० कोटी
३१- ( सहायक अनुदाने ) ( वेतनेतर )-१०० कोटी

---

**एकूण १५० कोटी**

## शासन निर्णय:-

तत्कालीन मा. मंत्री ( वित्त आणि नियोजन व वने ) यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक २०/८/२०१९ रोजी झालेल्या राज्यस्तरीय बैठकीत राष्ट्रपिता महात्मा गांधीजीं यांच्या १५० व्या जयंती निमित्त विविध विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या कार्यक्रमांचे सादरीकरण करण्यात आले यामध्ये रू.१४.३२ कोटीच्या प्रस्तावास मान्यता देण्यात आलेली आहे.

राज्यस्तरीय समितीने मान्यता दिलेल्या रू.१४.३२ कोटीच्या प्रस्तावास विभागाने संदर्भाधीन क्र.५ येथील दि. २६ फेब्रुवारी,२०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेली आहे. प्रशासकीय मंजूरी दिलेल्या रू.१४.३२ कोटीचा निधी BDS वर उपलब्ध करून देण्याकरीता प्रस्ताव वित्त विभागास सादर केला असता वित्त विभागाने प्रस्तावास मंजूरी दिली आहे.

त्यानुसार सदरचे अनुदान संबंधिताना वितरीत करण्यापुर्वी वित्त विभागाकडे विचारणा केली असता, या प्रयोजनाकरीता २६-जाहीराती व प्रसिध्दी या बाबींवर मंजूर असलेले रू.१.९७ कोटी इतके अनुदान वित्त विभागाने Lock केले असल्याचे कळविले त्यामुळे सदरचे अनुदान BEAMS प्रणालीवर संबंधिताना उपलब्ध करून देता येणार नाही. उर्वरीत खालील कार्यक्रमांसाठी २०- इतर प्रशासकीय खर्च या बाबींवर मंजूर असलेले रू.१२.३५ कोटी इतके अनुदान BEAMS प्रणालीवर संबंधिताना पुढीलप्रमाणे उपलब्ध करून देण्यात येत आहे.

| अ.क्र | विभागाचे नाव/ संस्थेचे नाव | कार्यक्रम | रुपये (कोटीत) | खर्चाचे उपशिर्ष | अमंलबजावणी करणारा विभाग | धनादेश अदा करण्याचे प्राधिकरण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | मणिभवन गांधी संग्रहालय | गांधी संग्रहालयाच्या देखभालीसाठी | ५.०० | २०-इतर प्रशासकीय खर्च | नियंत्रण अधिकारी/ आहरण व सवितरण अधिकारी ग्राम विकास विभाग | श्री. मे.तु. आजगावकर,कार्य कारी सचिव,मणिभवन गांधी संग्रहालय,मुंबई |
| २ | महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ | स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या हद्दीमधून निर्माण होणारे घरगुती सांडपाणी व घनकचरा यामुळे होणाऱ्या नद्यांच्या पाण्याचे प्रदुषण नियंत्रण | ७.०० | २०-इतर प्रशासकीय खर्च | नियंत्रण अधिकारी/ आहरण व सवितरण अधिकारी पर्यावरण विभाग | सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ |
| ३ | ग्रामविकास विभाग | सॉलीड वेस्ट मॅनेजमेंट व सेफ्टी टॅक क्लिनिग प्रोजेक्ट | ०.३५ | २०-इतर प्रशासकीय खर्च | नियंत्रण अधितकारी/ आहरण व सवितरण अधिकारी ग्रामविकास विभाग | संचालक, शासकीय सल्लागार, KPMG Advisory Services Pvt. Ltd Mumbai |
| | **एकूण** | | **१२.३५** | | | |

सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र. १०२/२०२०/ व्यय -१५, दि.२.०३.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२७१८१५०४९०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Yadav

Digitally signed by Sharad Yadav
DN: cn=Sharad Yadav, o=Rural Development Department, ou=Section Officer, email=sharad.yadav64@nic.in, c=IN
Date: 2020.03.27 19:08:47 +05'30'

**( शरद यादव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेता-१ ) ,महाराष्ट्र ,मुंबई
२. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेता-१ ) ,महाराष्ट्र ,नागपूर
३. अतिरिक्त मुख्य सचिव ,ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
४. सचिव,पर्यावरण विभाग,मंत्रालय,मुंबई
५. सदस्य सचिव,महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ,मुंबई
६. नियंत्रण अधिकारी/ आहरण व सवितरण अधिकारी,ग्रामविकास विभाग,मंत्रालय,मुंबई
७. नियंत्रण अधिकारी/ आहरण व सवितरण अधिकारी, पर्यावरण विभाग,मंत्रालय,मुंबई
८. कार्यकारी सचिव,मणिभवन ,मुंबई-१
९. संचालक, शासकीय सल्लागार,KPMG Advisory Services Pvt. Ltd Mumbai
१०. निवड नस्ती/पंरा-१